महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी
विकास महामंडळास खरेदी अनुदान
मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आविम-१०१५/प्र.क्र.२९/का.-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ३१ मार्च, २०१५.

**वाचा:-** १) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र.-टिडीसी-१०८७/प्र.क्र.८४/का.३, दि.२/६/१९८७

२) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र.-टिडीसी-१०९१/प्र.क्र.३०१९/का.३, दि.५/५/१९९७.

३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र.- आविम/विपणन/एखयो/खरेदी अनुदान/४०९२/१५, दि.६/२/२०१५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांच्यामार्फत राबविण्यात येणाऱ्या एकाधिकार खरेदी योजनेअंतर्गत कृषी उपज व वनोपज खरेदीसाठी होणाऱ्या व्यापारी खर्चापोटी शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र.- टिडीसी-१०९१/प्र.क्र.३०१९/का.३, दिनांक ५/५/१९९७ अन्वये प्रति क्विंटल रु. ११.७५ प्रमाणे खरेदी अनुदान शासनाकडून देण्यात येते. त्यानुसार आदिवासी विकास महामंडळाला त्या त्या वर्षाचे लेखापरिक्षण पूर्ण होईपर्यंत एकूण देय खरेदी अनुदानाच्या ८०% इतकी रक्कम व लेखा परिक्षण पूर्ण झाल्यानंतर उर्वरित २०% रक्कम मंजूर करण्यात येते. एकाधिकार खरेदी योजनेअंतर्गत महामंडळाने हंगाम २०१४-१५ मध्ये खरेदी केलेल्या ८८२३७.९८ क्विंटल कृषी उपज व वनोपजाकरिता खरेदी अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

शासन अधिसूचना दि. १९/१०/२०१३ अन्वये ८ जिल्ह्यातील २९ तालुक्यांत एकाधिकार खरेदी योजना महामंडळामार्फत सुरु करण्यात आलेली आहे. महामंडळाने हंगाम २०१४-१५ मध्ये (दि. १/१०/२०१४ ते ३१/१/२०१५ या कालावधीत) एकूण ८८२३७.९८ क्विंटल कृषी उपज व वनोपज खरेदी केले आहे. सदर खरेदीवर महामंडळास प्रति क्विंटल रु. ११.७५ प्रमाणे रु. १०.३७ लक्ष इतके खरेदी अनुदान देय ठरते. तथापि, शासन निर्णय दि. ५/५/१९९७ मधील तरतुदीनुसार सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाचे लेखा परिक्षण झालेले नसल्याने महामंडळास रु. १०.३७ लक्ष पैकी ८०% रु. ८.२९ लक्ष वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी सदरहू रक्कम रु. ८.२९ लक्ष (रुपये आठ लक्ष एकोणतीस हजार फक्त) एवढी रक्कम कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर खर्च हा "मागणी क्र.टी-५, लेखाशीर्ष २४२५ सहकार, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना- (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१)(०८) महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास वित्तीय सहाय्य (२४२५ ०८५३) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१४-१५ साठी करण्यात आलेल्या मंजूर तरतूदीतून भागवावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६६/१५ साऊ, दि. ३१/३/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३१२००९५०५८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar J Deshpande

Digitally signed by Chandrashekhar J Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrashekhar J Deshpande
Date: 2015.04.01 15:00:12 +05'30'

**( चं.ज.देशपांडे )**

शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
३) सहकार आयुक्त तथा निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) सहनिबंधक सहकारी संस्था, आदिवासी विकास, नाशिक.
५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८) वित्त विभाग (व्यय-१४/साऊ), मंत्रालय, मुंबई.

९) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक अॅन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.

१०) कक्ष अधिकारी (कार्या-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.